# द्वितीय खंड

—०—

## सृष्टीची रचना–ब्रह्मादिकांची उत्पत्ती-चतुर्वर्ण व चार आश्रम

श्रीगणेशायनम :– **शौनक : सूता !** आपण जे वक्रतुंडाचे अतुल चरित्र सांगितले ते ऐकून आम्हाला एकदंताच्या कथा आणखी सांगा, आमची तृप्ति होत नाही, असे ह्मणावे लागते,' ते ऐकून सूताला हर्ष झाला व तो ह्मणाला : 'ऋषीहो ! मुद्गलऋषींसही दक्षप्रजापतीने असाच प्रश्न करून विनंति केली होती की, 'गजाननाच्या कथा, त्यांचे कर्म, त्याचे वाहन, त्याचे स्वरूप इत्यादि सर्व सांगा.' हे ऐकून मुद्गलऋषीने पापविनाश करणारी गणेशकथा सांगण्यास आरंभ केला. प्रथम त्याने सृष्टीचा आरंभ सांगितला, तो असा: गणेशांनी वर दिला होता ह्मणून ब्रह्मदेवाला सृष्टि करावी असे वाटले. मग तो विष्णुशरीरांत एक वर्ष राहून नाभिद्वाराने बाहेर आला व कमळावर बसून हेरंबध्यान करू लागला. तेव्हा त्याच्या शरीरामधून प्रचंड जलप्रवाह निघाला व तो सर्वत्र पसरला. ब्रह्मा ह्या जलांत पोहत असता त्यांत श्रीगणपतीची मनोहर पण अंगुष्ठाकार मूर्ति दिसली. ब्रह्मदेवाने तिचे स्तवन केले. पुढे तो श्वासमार्गाने गणपतीच्या उदरांत गेला व तेथे

त्याने व्यवस्थित विश्वरचना पाहिली. बाहेर येऊन त्याने पुनः ईशस्तवन केले, तेव्हां सृष्टिरचनेचे गुह्य त्याला समजले. असो; नंतर ब्रह्मदेवाजवळ स्वयंभू अविद्या, माया, प्रकट झाली. प्रथम ब्रह्मदेवाने सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे मानसपुत्र उत्पन्न केले. हे सर्व महाज्ञानी होते. पित्याच्या आज्ञेवरून त्यांनी योगमार्ग स्थापन केला. पण हे पुत्र सृष्टिकर्म करीनात; यामुळे वडिलांचे समाधान झाले नाही. त्याने सृष्टीसाठी महातेजस्वी रुद्र ह्मणजे शंकर जन्मास आणला व त्याला अष्टमूर्तिधर केले. शंकराला ही ब्रह्मदेवाने सृष्टि करण्यास सांगितले, तेव्हा त्यांनी अमरसृष्टि निर्माण केली पण जन्ममरणात्मक सृष्टि नाही ह्मणून ब्रह्मदेवाचे समाधान होईना, तेंव्हा त्याने वेद, शास्त्रे व पुराणे निर्माण करून त्यांस विश्वरचनेचे काम सांगितले. त्यांनी नानाप्रकारची कर्में उत्पन्न केली. ब्रह्मदेवाने यज्ञ करून चतुर्भुज विष्णूची उत्पत्ति केली व त्यास गणेशस्मरण करावयास सांगितले व सृष्टिरचनेची आज्ञा केली. विष्णूने अनेक यज्ञ निर्मिले नंतर ब्रह्मदेवाने मरीचि, भृगु, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, दक्षा! तुला व अंगिरा, वसिष्ठ व नारद अशा दहा तेजस्वी पुत्रांस जन्म देऊन त्यांसही सृष्टिरचनेविषयी आज्ञा केली. नारदाशिवाय ही आज्ञा सर्वांनी मान्य केली व ते तपश्चर्येला गेले. 'ब्रह्मचारी राहीन' असा संकल्प करणाऱ्या नारदाला 'तूं शूद्र होशील व पुढे गंधर्व होऊन भोगरत होशील' असा ब्रह्मदेवाने शाप दिला व आपल्याला उगीच शाप दिला म्हणून नारदाने पित्याला 'तूं अपूज्य होशील' असा प्रतिशाप दिला. पुढे नारदाने गणपतिपूजन व स्तवन करून उःशाप संपादन केला व गणेशभजनामध्ये निमग्न झाला.

नंतर पुरुषसूक्तांत सांगितल्याप्रमाणे ब्रह्मदेवाने चतुर्वर्णांची उत्पत्ति केली व मस्तकापासून संन्यासांश्रम, हृदयापासून वानप्रस्थ, जंघापासून गृहस्थाश्रम व नाभीपासून ब्रह्मचर्यांश्रम संपादिता झाला; तसेच, उदरापासून धर्म, पाठीपासून अधर्म, व याचप्रमाचे पशुपक्षांपासून तो सिद्ध, गंधर्व, देव इत्यादिपर्यंत सर्व जातीचे जीव उत्पन्न केले. तसेच, महत्तत्त्व पंचतन्मात्रा, इंद्रिये, व स्थावर, तिर्यग्योनि ( पशुपक्षादि ), देव, मानव, भूते, प्रेते, पिशाचे व मानसपुत्र ( कुमार ) असे नऊ सर्ग उत्पन्न केले. नंतर दक्षिणांगातून पुरुष व वामांगापासून प्रकृति उत्पन्न करून त्यांस मैथुनात्मक सृष्टि उत्पन्न करण्याची आज्ञा केली,

## मधुकैटभवध

असो; एकदा विष्णूने कानांतील मळ काढला. त्यापासून मधु व व कैटभ या नांवाचे दोन भयंकर राक्षस उत्पन्न झाले. त्यांनी लवकरच स्वभुजवीर्याने त्रिभुवनाचे स्वामित्व संपादिले; व ब्रह्मदेवाचा व विष्णूचा पराभव केला. तेव्हां या विघ्ननाशार्थ शंकरांनी 'श्रीगणपतीच्या षडक्षरी मंत्राचा जप करा' असा विष्णूस उपदेश केला; त्याप्रमाणे विष्णूने तपश्चर्या करून गणपतीस प्रसन्न केले व त्या बुद्धिदात्या गणपतीचे भक्तिपूर्वक स्तवन करून त्यापासून भक्ति, ज्ञान, कीर्ती ईत्यादिकांसह मधुकैटभांचा वध करण्याचा मंत्र मागून घेतला व जेथे ईश्वर प्रसन्न झाला तेथेच ( सिद्धिपुरास ) गणपतीची स्थापना करून आपणही सपरिवार राहूं लागला. पुढे लवकरच विष्णूने मधुकैटभाचा वध केला.

इकडे नऊ मानसपुत्रांनी गणेशाची एकनिष्ठ तपश्चर्या करून त्यास प्रसन्न करून घेतले आणि अखंड भक्ति व सृष्टिकर्मांची शक्ति मागून

घेतली. पुढे दक्षराजा ! त्वां शक्तीचे आराधन करून तिच्याकडून वर घेतलास कीं, ' मी तुझ्या पोटीं येईन व पुत्रपौत्रादिकांस अवतीर्ण करीन.' ' पण पुढे तूं गणेशविस्मरण केलेस व त्यामुळे संकटात पडलास.

**सूतः**- मुनिहो ! दक्षाला मुद्गल ऋषींनी पुढें सांगितलें:—

स्वायंभुव मनूनें गणेशतपश्चर्या केली. काही कालानें परमेश्वर प्रसन्न झाला व त्यास सर्व प्रकारचे मंगलप्रद आशीर्वाद देता झाला. त्यानेंही अखंडभक्ति सृष्टिरचनासामर्थ्य व प्रजापालनत्व मागून घेऊन तो सर्वथा सुखी झाला. पुढें त्या महागाणपत्य मनुराजाला शतरूपा स्त्री ब्रह्मदेवाने दिली. त्यांस प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र व आकूति, देवहूति व प्रसूति ह्या तीन सुलक्षणी मुली झाल्या. पुढे त्या उपवर झाल्या असे पाहून त्याने ह्या आपल्या मुली अनुक्रमें रुचि, कर्दम व दक्षा ! तूं, यांस दिल्या. कर्दम-देवहूतींच्या उदरीं कपिल महामुनि विष्णूच्या अंशाने झाले. रुचि—आकूति यांच्या उदरी यज्ञ नामक ऋषि महागाणपत्य झाला. तुलाही चोवीस अपत्यें झाली. त्यांपैकीं श्रद्धादि तेरा कन्या तूं यम धर्माला दिल्या. त्यांच्या ह्मणजे श्रद्धादिकांच्या पोटीं काम, अर्थ इत्यादि मातृस्वभावानुसार सत्पुत्र झाले व त्यांनीं दैवीं संपत्तींचा विस्तार केला. पण ब्रह्मदेवाच्या पाठींपासून अधर्म झाला होता, त्यास हिंसा ही बायको मिळून त्यांनीं, अमृत नामक मुलगा व निकृति नामक मुलगी अवतीर्ण केली. या उभयतांनीं आसुरी संपत्तींचा विस्तार केला.

असो; बाकीच्या राहिलेल्या दहा कन्या रुद्र, मरीचि, अंगिरस इत्यादिकांस दिल्या व त्यांस कार्तिकेयादि पुत्र झाले. सोम, दुर्वास,

दत्त हे अत्रि–अनसूया–यांचे मुलगे होत याप्रमाणें प्रत्येक कन्येस संतति झाली व तुझी व तुझा वंशविस्तार पुष्कळच झाला. यापैकी कित्येक ऋषिपुत्रांनी गणपतींची भाक्ति करून त्याला प्रसन्न करून घेतले आणि एकाग्रभक्ति,, स्वकर्मसामर्थ्य व सत्यसंकल्पत्व इत्यादि वर मागून घेतले.

## स्वायुंभव मनु–त्याची संतती–चंद्र, दुर्वास व दत्त यांचा वृत्तांत

शौनक ऋषि विचारतात:- ‘सूता! अत्रिपुत्रांचें पवित्र चरित्र आह्मास सांगता का?’

**सूत** :– ‘होय’ चंद्र हा ब्रह्मदेवाचा अंश असून गणपतीच्या प्रसादाने तो अमृतस्वरूप झाला. हा चंद्र आपल्या षोडश कलांनी देवांचे पोषण करतो व आपल्या किरणांनी तो अन्नवृद्धि करतो. दत्त हा विष्णूचा अंश आहे. तो नित्य योगी स्वरूपाने राहतो. त्याचा योग व त्याचे वैराग्य पाहून द्विजादि सर्व वर्ण त्याचे भक्त झाले, पण त्याच्या स्वतःच्या मनाला समाधान नव्हते. ह्या मंडळींतून कसे सुटावे व काय करावे हे त्याला सुचेना. तेंव्हा त्याने एकदा जळांत उडी टाकली व स्वतःच्या योगसामर्थ्याने एका हातात मोक्षलक्ष्मी घेतली व दुसऱ्या हातात मद्यकुंभ घेऊन तो पिण्यास त्याने आरंभ केला. स्त्रियांसह अनेक प्रकारचे विलास हा दत्तयोगी भोगू लागला. हे

भ्रष्टाचार पाहून त्याचे शिष्य भ्याले व पळून गेले. तेंव्हा दत्ताचा योगाभ्यास ठीक सुरू झाला. तो सहजावस्थेत राहत असे. तथापि योगाने त्याचे चित्ताला स्थिरता येईना. तेव्हा तो वडिलांकडे म्हणजे अत्रिऋषींकडे गेला व 'मी सोपाधिक राहून पाहिले, निरुपाधिक होऊन पाहिले, साम्यावस्था कायम व सहजावस्था संपादित करून. योगाभ्यासातही राहिलों: पण चित्ताला शांति प्राप्त होत नाहीं. म्हणून कृपा करून मला शांतियोग आपण सांगा.' अशी विनंती केली. मग वडिलांनी त्यास गणपतीची आराधना करावयास सांगितली. त्यांनी श्रीगणपतीचे स्वरूप, अभेदज्ञानयोग, सहजयोग, स्वानंदयोग, शांतियोग व पूर्णयोगात्मक श्रीगणेश इत्यादिक स्वरूपांची पूर्ण माहिती, पंचचित्तांचा प्रणाश व पंच ऐश्वर्यांचा लय इत्यादि शांतियोगांची प्रक्रिया व एकाक्षरी मंत्र, ह्या सर्व गोष्टी सांगून दत्ताला गणेशभक्तिचा मार्ग दाखवून दिला. दत्तांनीहीं गणपतीची गंगादक्षिणतीरी उत्तम भक्ति करून त्यांस प्रसन्न करून घेतले. श्रीगणेशानेही त्यांचे सुंदरस्तोत्र ऐकून घेऊन त्याला इष्ट वर दिले आणि आपण स्वतः तेथेच 'विज्ञानगणप' या नावाने आपल्या भक्ताजवळ राहूं लागले. शंकरानीच त्या देवाला 'विज्ञानगणराज' असे नांव ठेऊन गणेशभक्तिसंप्रदाय वाढविला. ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीस स्थापना झाली ह्मणून त्या दिवशी या ठिकाणी सर्व देवदानवादि महात्मे प्रतिवर्षी मोठा उत्सव करतात. अत्रीचा तिसरा मुलगा महातामसी दुर्वासऋषि यानेही गणेशसेवा करून आपला तमःस्वभाव सोडून दिला व शांतियोगाचे संपादन करून घेतले.

## मनुपुत्र प्रियव्रत व उत्तानपाद–जंबूद्वीप–भूर्भुवादि सप्त लोक–सप्तपाताले–ह्याची माहिती

पुढें दक्षराजाने मुद्गलऋषीला स्वायंभुव मनूच्या पुत्रांची कथा विचारली व मुद्गलाने सांगितल्याप्रमाणेच सूताने शौनक ऋषीस सांगितली ती अशी. मनूला दोन मुलगे झाले. एक प्रियव्रत व दुसरा उत्तानपाद. यांतील प्रियव्रत निवृत्ति मार्गाला लागला ह्मणून बापाच्या सांगण्यावरुन नारदाने प्रियव्रतास प्रवृत्तिमार्गाचा उपदेश केला. त्यांत मुख्य गोष्ट ही की 'आपण नरदेहांत आल्यानंतर वर्णाश्रमधर्माचे यथास्थित अनुपालन केले ह्मणजे विश्वसंरक्षण होते; यज्ञयागादिकांनी देवऋण फिटते. श्राद्धतर्पणादिकांनी पितृऋण फिटते व पुत्रोत्पत्तीने मनुष्यऋण फिटते. ही ऋणे फेडल्यावर व वर्णाश्रमधर्म यथास्थित पाळल्यावर मग निवृत्तीच्या मार्गाला लावावे.' पुढे नारदांनी त्याला गणेशदेवतेच्या आराधनेचे स्वरूप, फलमहात्म्य ही सांगितली. ही ऐकून प्रियव्रताने गणपतीचे नारदाच्या उपदेशाप्रमाणे आराधन केले. निवृत्तिपंथ सोडून देऊन त्याने राज्याचा स्वीकार केला व यथाधर्म, यथान्याय, यथानीति प्रजांचे पालन करून गणपती-प्रसादाने तो स्वानंदाख्यनामक गणेशलोकांप्रत जाता झाला. आपल्या दहा पुत्रांपैकी सात पुत्रांस त्याने जंबु प्लक्ष, शाल्मल, कुश, क्रौंच शाक व पुष्कर या सप्तद्वीपांचे अधिपति केले. पुष्करद्वीप अति सुंदर असून तेथे सूर्यचंद्रास स्वतःभोवती फिरावयास लावणारा लोकालोक पर्वत आहे. तेथील सर्व प्राणी एकच वर्णाश्रमधर्माचे आहेत. सर्व दैवीसंपत्तीचे लोक तेथे राहतात. याचप्रमाणे प्रत्येक द्विपात नद्या पर्वत वृक्ष, प्राणी इत्यादिकांची विशेष समृद्धि असून आपआपल्या वर्णाश्रमानुसार चालणारे आहेत. जंबुद्वीपामध्ये जो मेरु पर्वत आहे तो

सुवर्णधातुमय असून तेथे अनेक धातूंच्या खाणी, सर्व प्रकारची झाडे, सुजलवाहिनी नद्या, भव्य गुहा इत्यादि अनेक चमत्कार आहेत. हा पर्वत खूप मोठा, खूप उंच व खूप रुंद आहे. येथे देवापासून तो सूक्ष्म कीटकांपर्यंतचे सर्व प्राणी राहतात. हा नऊ खंडाच्यामध्ये आहे. येथे हिमालयनामक अति मोंठा पर्वत आहे. ज्या वर्षांत हा हिमालय आहे, त्याला भारतवर्ष ह्मणतात. कर्मांचा भर येथे असतो ह्मणून त्याला भारतवर्ष हे नाव दिले आहे. या भारतवर्षात शीतोष्णता रोगसमृद्धि, चारवर्ण व त्यांचे संकर, व स्वार्थी लोक विशेष आहेत !

असो; सूर्यचंद्राचे किरण पोहोचतात तेथपर्यंत भूलोक, भूलोकापासून सूर्यांपर्यंत भुवर्लोक, तेथून धृवा१पर्यंतचा स्वर्गलोक, ध्रुवापासून कोटि योजन दूर असणारा महर्लोक ( येथे कल्प आयुष्याचे लोक राहतात ), तेथून कोटियोजन असणारा जनोलोक, तितकाच दूरचा

---

१ येथे सूर्यचंद्रादिकांचे आकार व विस्तार दिले आहेत, पण आध्यात्मिक ज्योतिषाच्या ज्ञानाशिवाय हे आकडे समजणार नाहीत, ह्मणून येथे दिले नाहीत. मुळांत रवि हा प्रकाशदाता, सृष्टिस्थितिलयकर्ता, सर्वाधार आहे, असे वर्णन आहे. यमादि लोकांचे वर्णन आहे. याप्रमाणे द्वादशमासांत सूर्याबरोबर फिरणारे देव, ऋषि, नाग, अप्सरा, पक्षी, वायु, गंधर्व इत्यादिकांच्या याद्या दिल्या आहेत. तसेच चंद्राबरोबर असणारी मंडळी, अमृत पिणारे देव, स्वधा पिणारे पितर, मंगळ, बुधादिकांचे सहचर, इत्यादिकांची माहिती देऊन हे सर्व ज्योतिर्गण ध्रुवाधारानें राहतात हे जे सांगितले आहे, ते चिंत्य होय.

तपोलोक ( येथे वैराज देव असतात ), तितकाच. लांब सत्य लोक आहे. (येथे नित्य ब्रम्ह्याची वसति आहे.) येथे नैष्ठिक ब्रह्मचारी, तापसी, सिद्ध, याजक राहतात. हा तेजस्वी लोक गणेश लोकांचे द्वार आहे, याच्याही पुढे हजारो हजार कोटी योजने लांब असे निराधार सूर्यलोक, विष्णु लोक ( वैकुंठ), शंकरलोक व शेवटी ब्रह्मस्वानंद लोक आहेत. याच्या पलीकडे कांही नाही. येथे स्वानंदनामक ब्रह्म आहे. ब्रह्म चार प्रकारचे आहे. ( १ ) अव्यक्त व निर्मोहरूपक ब्रह्म ( शिवसंज्ञक ); ( २ ) समब्रह्म ( विष्णुसंज्ञक ); ( ३ ) आत्मस्वरूप-ब्रह्म ( सूर्यसंज्ञक ); ( ४ ) असन्मय ब्रह्म ( शक्तिसंज्ञक ). या सर्वांत अभेद आहे, असे ज्ञानविज्ञान होणे हाच स्वानंद होय. हा पूर्ण आहे. गणपतीचे हेच स्वरुप आहे.

अतल, वितल, सुतल, तलातल, महातल; रसातल व पाताल, ही सात पातालांची स्थाने आहेत, व पातालांत शेष राहतो. त्याची सेवा करणारे दैत्य, सुर व नाग आहेत. येथे सर्व प्रकारचे भोग मिळतात. येथील महाराज शेष हा गणेशभक्त आहे. ह्यालाच अनंत म्हणतात. याच्याखाली कच्छप पाताल, त्याच्या खाली निराधार वराहपाताल व त्याच्याखाली नरकलोक आहे. ह्याप्रमाणे हे ब्रह्मगोल वर्णन आहे.

## गणेशयोग–भरताच्या तीन जन्मांची कथा

प्रियव्रताच्या पणत्वाला १०० पुत्र झाले. यांत ८१ ब्राह्मण, ९ योगी, ९ राजे व भरत असे हे शंभर होत. मनूने नऊ मुलांस ९ खंडाचे राज्य देऊन आपण ऋषभ नावाने वनात जाऊन तेथे उत्तम योगाभ्यास केला. तो अवधूत झाला. पण त्याला शांति देणारे ब्रह्माचा अधिगम झाला नाही. ह्मणून त्याने शंकराची प्रार्थना करून तारकयोग

( गणेशयोग ) समजून घेतला. सामवेदांत ह्मटले आहे. " मनाला व वाणीला गोचर असणारे जे दृश्य व अदृश्य स्वरूपी विश्व ते ' ग ' काररूपी आहे. यांत ' त्वं ' पद व ' तत् ' पद यांचा अंतर्भाव होतो. नंतर मनोवाणीस जे अगोचर व जे संयोगवियोगात्मक आहे; ते ' जीवात्म–परमात्म–ऐक्यभावरूप ' असून तेच ' ण ' कारसंज्ञेने ओळखिता येते. या उभयतांचा स्वामी गणेश आहे ' ह्मणून शंकरांनी ऋषभाला सांगितले की ' तूं गणेशयोगाचे आराधन कर. ' हा गणेश चित्ताच्या पंचभूमीवर प्रकाश पाडतो ह्मणून त्याला ' चिंतामणि ' ह्मणतात. ह्याचे आराधन कर ; तुला शांति मिळेल. ' याप्रमाणे उपदेश घेऊन ऋषभाने गणपतीची भक्ति व गणेशयोगाचे आराधन, या साधनांनी परमेश्वरास प्रसन्न केले. व तो प्रकट झाल्यावर त्याची स्तुति केली. परमेश्वर त्याला वर व शांति देऊन अंतर्धान पावले. ऋषभाने संन्यास घेऊन योगमार्गाचा अवलंब केला. ह्याचा ज्येष्ठपुत्र भरत होय. याने पुष्कळ वर्षे धर्मयुक्त राज्य केले व पुत्रास राज्य समर्पण करून आपण वनामध्ये गेला व शालिग्रामपूजा करीत व विष्णुस्मरण करीत राहिला. एकदा भरत हा नदीतीरावर तपश्चर्या करीत असता तेथे पारध्यांनी गाठलेली व ह्मणून भयभीत पण गर्भवती अशी एक हरिणी उडी मारून नदीपलीकडे गेली; तेव्हां तिचा गर्भ पाण्यात पडला. दयावत्सल भरताने तो बालमृग उचलून घेतला व त्याचे पुत्राप्रमाणे प्रेमपुरःसर पालन केले. पुढें त्याला त्या मृगपोतकाचे वेडच लागले. यामुळे स्नानसंध्यादि नित्यकर्मांचा लोप झाला. पुढे तो मृग सहज पळून गेला, पण भरताने ' मृग, मृग ! ' ह्मणून दुःखाने हाय घेतली. अंतःकाली मृगाचे स्मरण व ध्यान राहीले ह्मणून भरत मृगजन्मास गेला. तथापि पूर्वपुण्याईमुळे त्याचे पूर्वज्ञान जिवंत होते. अर्थातच

तो इतर मृगांपासून विभक्त झाला व हिंसा न करता शुष्कतृणावर आपली उपजीविका करू लागला. पुढे त्याच वनात पुलह नामक ऋषि महागाणपत्य होते, त्यांच्या आश्रमांत कर्मधर्मसंयोगाने हा मृग गेला व गणपतिस्मरण करीत तेथेच राहिला. पुढे एकदा तेथे ब्रह्मदेव आले, ऋषींनी त्यांचा यथासांग पूजापूर्वक सत्कार करून व त्याचे पादसंवाहन करण्यास आरंभ केला व ज्ञानवृद्धोसाठी 'संसारी जीवांची सुटका होण्याला मार्ग काय?' असा प्रश्न विचारला. ब्रह्मदेव सांगतातः

'सत्पुत्रा! संसार ह्मणजे दुःखात्मक आहे. दुःख ह्मणजे विघ्नच होय. विघ्नविनाश करणारा देव ह्मणजे गणपति होय. याची भक्ति केली नाही, तर विघ्ने ह्मणजे दुःखे उत्पन्न होऊन ती जीवाला कर्मांच्या व जन्ममरणाच्या चक्रात घालतात. तेव्हां सुटका करून घ्यावयाची असेल तर आपल्या या चार देहात कल्पनारूप मोहाचे जे बंधनरूपी वास्तव्य आहे त्याचा नाश ह्मणजे कल्पनांचा नाश झाला पाहिजे. कल्पना त्वंपदात्मक असो, तत्पदात्मक असो, 'असि' पदात्मक असो, ती कल्पनाच आहे, विघ्नकारिणीं आहे, ह्मणून कल्पनेचा त्याग करून चित्तांतील पांचही भूमींचा त्याग कर; तुला शांति मिळेल' इतके सांगून ब्रह्मदेव अंतर्धान पावले. पुलह ऋषीने वडिलांनी सांगितल्याप्रमाणे योगाभ्यास केला व ध्यानांत गणपति येईनासा झाला तर त्याची पूजा करून तो प्रसन्न होईल असे केले. कांही दिवसांनी त्याला गणपतीचा साक्षात्कार झाला. पूजा; स्तोत्र इत्यादि उपचार झाल्यावर गणेश त्याला 'अव्यभिचारी भक्त तूं होशील' असा आशीर्वाद देऊन अंतर्धान पावले पुलह तर महाभक्त झालाच, पण जो हरिणरूपी भरत तेथे होता त्यालाही

ज्ञान झाले व त्याने आनंदाने गणेशभक्ति केली. अर्थातच तो पुढे मनुष्ययोनीत जन्मास आला. अंगिरानामक ब्रह्मकुलांत त्याचा जन्म झाला. पण पूर्वी ठेच लागल्यामुळे त्याने संग विवर्जित केला. उत्तम ज्ञानी असूनही 'आपण बुद्धिहीन आहोत' असे तो दाखवी. बुद्धि नाही, कांही कळत नाही, ह्मणून त्याला 'जडभरत' हे नांव मिळाले. असो; त्याची मुंज मात्र कष्टाने झाली. लग्न झालेच नाही. माता-पिता स्वर्गवासी झाल्यावर त्याच्या भावाभावजयांनी त्याचा अतिछळ केला, त्यास उष्टेमाष्टे खाण्यास घातले, अंगाला धड वस्त्र दिले नाही, वाटतील ते शिव्याशाप दिले. पण भरताने आपले गणेश-ध्यान व आपले शांतिव्रत, ही कांही सोडिली नाहीत. खावयास घरी मिळेना ह्मणून तो लोकांचे काम करून खाणेपिणे मिळवू लागला. जडभरत काम करतो हे पाहून त्याच्या भावांनी पुनः आनंदाने त्याला घरी आणले व काम करावयास लावले. त्याच्या भावजया पण त्याला वाईट अन्न देत असत. तथापि जडभरत आपले अन्न 'अमृत आहे' असे मानून ते प्रेमाने खात असे. पुढे त्याला भाताच्या शेतावर राखणीस ठेविले असतां एका रात्री चोरांनी पकडले. चोराच्या नायकाने आपल्या देवीला असा नवस केला होता की, 'मला पुष्कळ द्रव्य मिळाले तर मी तुला एक उत्तम पुरुषपशु बळी देईन.' द्रव्य मिळाल्यावर त्या चोरांच्या नायकाने पुरुषशोधार्थ आपले लोक पाठविले व जडभरतास पाहून त्यांनी त्याला जबरीने नायकाकडे नेले. जडभरतानेही मनोनिश्चय केला की, आपले देहप्रारब्धच या प्रकारचे! ठीक आहे. पुढे बळीची पूजा करून, त्यास गोडधोड खावयास घालून, व वाजंत्री लावून त्याला देवीपुढे नेले व देवीला अर्पण करण्यासाठी

नायकाने तरवारीचा हात उगारला. पण भरताने 'हूं का चूं' केले नाही! गणपतीचे स्मरण करीत तो स्वस्थ उभा होता. 'देह आज गेला काय किंवा शंभर वर्षांनी गेला काय गणेशस्मरण असेल तर फलश्रुति एकच आहे,' असा त्याच्या मनाचा निश्चय होता. इकडे चोराने तरवारीचा हात उगारिला होता, तो स्तब्ध करून त्याच तरवारीने गणेशभक्त देवीमातुश्रीने, चोराला बळी दिला आणि त्याचे व त्याच्या साथीदारांचे रक्त पिऊन ती गणेशस्तवन करीत अंतर्धान पावली व भरतही गणेशस्मरण करीत रानावनांत हिंडू लागला.

## रहूगण-राजास उपदेश

इकडे रहूगण या नांवाचा एक राजा प्रारब्धानुसार संसारापासून विरक्त होऊन अंतर्निष्ठ झाला. पुढें मनाला शांति मिळावी म्हणून तो गंगातीरावर असणाऱ्या कपिल महामुनींच्या आश्रमांत राहून कपिल महामुनींचा उपदेश घ्यावा एतदर्थ निघाला होता. गौतमीच्या दक्षिण-तीराला त्यास जावयाचें होतें. तो राजा शिबिकेत बसून चालला होता. पुढें डोलीवाले थकत चालले म्हणून त्यांनीं मार्गात दृष्टिस पडलेल्या भरतास पकडलें व पालखी उचलण्यास भाग पाडले. मुनींनीं 'हेंही प्रारब्धच आहे' असे समजून आनंदाने पालखी वाहूं लागले. पण ते स्वतः फार दयाळू, कीडमुंगी वाटेंत आली, तर ती चुकवून पाय टाकीत, यामुळें पालखीला हिसका बसून आंतील राजाला त्रास होई. तेव्हां संतापून राजानें हुकूम केला की 'पालखी नीट चालवा; नाहींतर शिक्षा होईल.' इतर वाहकांनी भरताविरुद्ध तक्रार केली की 'हा

मढ्याप्यासारखा उड्या मारीत चालतो.' मग राजा भरताला रागें भरूं लागला. तेव्हां हा 'योगनिष्ठ आहे, शांतीप्रीत्यर्थ हिंडत आहे, याच्यावर आपणच अनुग्रह करावा' असा राजाच्या प्रारब्धबलानें भरतमुनींचा निश्चय होऊन त्यांनीं वेदांत बोलण्यास आरंभ केला. ब्रह्मरूप सांगितल्यावर 'बोधनाश झाला ह्मणजे उत्थान नाहींसे होऊन स्वसुखैकरत पुरुष होतो. पण परसुख जेथें नाहीं तेथे स्वसुख नसते. तेंव्हा 'पर' नामक उत्थानाचे बींज समजून घेऊन तें उत्थान व स्वतःचे उत्थान या उभयतांच्या व्यतिरिक्त जे स्वानंदसुख आहे, ते जाणून घ्यावे व पुढे पांच प्रकारचे ब्रह्म आहे तेही समजून घ्यावें; म्हणजे निर्मायिक जो गणेश त्याचे शांतिमंय स्वरुप समजेल; पण हें समजण्याला चित्ताच्या पांच भूमिका ओलांडून गेले पाहिजे. ही स्थिती प्राप्त झाली ह्मणजे शांति मिळते.' हे ऐकून राजा चकित झाला. त्याने खाली उतरून भरताला अनेक शिरसाष्टांगप्रणिपात करून त्याची पुष्कळ स्तुति केली. पुढे, गुरुपदेश घेऊन व भरताची आज्ञा घेऊन तो बनांत निघून गेला. इकडे भरतयोगी हिंडत हिंडत गणेश क्षेत्रास आले व तेथे एक वर्षभर राहून त्यांनी गणेशाची योगपूर्वक एकनिष्ठ उपासना केली. ह्यास गजाननांनी प्रत्यक्ष दर्शन दिले. भरतांनी योग्य स्तुति करून 'भक्ति' मागितली. परमेश्वरांनी संतुष्ट होऊन ती दिली. काय क्तीचे सामर्थ्य की स्वानंदसुखी गणेशराज भक्तिमोहित होऊन भरताला व्यक्तस्वरुपांत दिसला! असो; भरताचा देहमोक्ष झाल्यावर ते गणेशरूप झाले. त्यांची ही गुहा गणेशस्थानापासून एक कोसावर आहे. याप्रमाणे भरताची गोष्ट झाली.

# ध्रुवराजा—वेनराजा व पृथुराजा यांची गोष्ट

मुद्गल सांगतात :— स्वायंभु मनूला उत्तानपाद ह्मणून दुसरा मुलगा होता, तो मध्यदेशाचा राजा झाला. त्याला सुनिति व सुरुचि अशा दोन बायका होत्या. सुनीतीला ध्रुव व सुरुचीला उत्तम असे दोन पुत्र झाले. राजा सुरुचीला वश झाल्यामुळे सुनीति व तिचा मुलगा या उभयतांवर त्याचे मुळीच प्रेम नव्हते. असो. एकदा राजबालक ध्रुव आपल्या मांडीवर बसावयास गेला तो सुरुचीने त्यास लाथ मारुन ढकलून दिले. तेव्हां त्या बालकाला अत्यंत क्रोध येऊन तो आईला विचारून अरण्यात गेला. तेथे त्याची व नारदाची गाठ पडली व त्यांच्याकडून विष्णुमंत्राची दीक्षा घेऊन ध्रुव मथुरेस गेला. तेथे सहस्त्रवर्षें तपश्चर्या करून त्याने विष्णूस प्रसन्न करून घेतले. श्रीविष्णूंनी त्यास पृथ्वीचे राज्य व अखंड ध्रुवपद दिले. ध्रुवबाळाने हे वर्तमान मातापित्यांस जाऊन सांगितले, तेव्हा त्यास अतिहर्ष झाला. उत्तानपादालाही पश्चात्ताप होऊन त्यानें धृवाला राज्यकारभार सोपवला व आपण वनांत तपश्चर्येसाठी गेला. तेथे नारदाची गांठ पडून त्यांनी राजांस गणेशोपासना दिली व ती करून राजाने सायुज्यमोक्ष मिळविला इकडे राजा ध्रुव राज्य करीत असतां एकदिवस नारदाची स्वारी स्वशिष्याकडे ह्मणजे ध्रुवाकडे जाऊन त्याला वैकुंठवासी विष्णूचा संदेश सागती झाली की ‘ स्वकल्याणासाठी गणेशयात्रा व गणेशमंत्राचा जप कर, ह्मणजे अखंडपदाची प्राप्ति निर्विघ्न होऊन तुला शांति मिळेल. ’ ध्रुवाने उपदेशानुसार गणेशयात्रा, गणेशमंत्रजप व ‘ ध्रुवविनायका ’ ची स्थापना केली व गणपतीचे एकनिष्ट आराधन करुन शांतचित्ताने धर्म—न्याय—नीतिने राज्य केले. पुढे देहप्रारब्ध संपल्यावर तो गणेशलोकाप्रत जाऊन सायुज्यपद पावला.

ध्रुवाचा नातु वेन हा बाप असताच वाईट छंदास लागला. बाप राज्य सोडून गेला तेव्हा अराजकी वाढली. ह्मणून ब्राह्मणांनी वेनास गादीवर बसविले. त्याने चोरांचा नाश केला पण 'मलाच देव ह्मणा' असा आग्रह धरुन बसला. हा अत्याचार पाहून ब्राह्मणांनी शाप दिला व तो मेला. पुढे ब्राह्मणांनी त्याचे वामांगमंथन केले तेव्हां ऱ्हस्व, केसाळ, कुरुप असा निषाद उत्पन्न झाला. ब्राह्मणांनी त्यास वनांत पाठविले. हाच निषादांचा मूळ पुरुष होय. वेनाच्या उजव्या अंगापासून विष्णुप्रसादाने पृथुनामक पुरुष उत्पन्न झाला. हा धर्मप्रवर्तक राजा सर्वांस सुख देता झाला. तथापि वेनाच्या पापामुळे पृथ्वीने सुपीकपणा आकर्षण करून घेतला होता, तो बाहेर काढला नाही त्यामुळे सर्वांस अतिताप झाला. लोक व राजा संतापले. पृथ्वीस मारण्यासाठी राजा उद्युक्त झाला; तेव्हा गोरुप धरून प्रुथ्वीने त्याला विनंती केली किं; 'आर्य लोक स्त्रियांस कधीही वाईट वागवीत नाहीत; राजा मला मारूं नको; मी गिळलेली सुपीकता पुनः बाहेर यावी, असा तुझा हेतु असेल तर पर्वत मोडून मला सारखी कर व मी दूध देईन ते सर्वत्र शिंपड.' मग पृथूने पर्वतादिकांचे चूर्ण करून पृथ्वी सारखी केली, ग्राम नगरे इत्यादिकांची रचना केली, गोरुपी पृथ्वीचे दोहन करून सर्व प्रकारची षड्रसअन्ने निर्माण केली. त्याच वेळी देवादिकांनीही दोहन करून अनंत प्रकारच्या सुंदर व उपयोगी वस्तु काढल्या. सर्वत्र आनंद झाला. कारण सर्वत्र सुभिक्ष झाले. असो; यानंतर पृथूने ९९ यज्ञ केले. १०० व्या यज्ञाच्या वेळी इंद्राने यज्ञीय अश्व चोरण्याची सहा वेळा खटपट केली व सहा वेळा पृथुपुत्राने व पृथूने इंद्रास पकडला असतां त्याला सोडून दिले.

असो; याप्रमाणे पृथु राज्य करीत असता एक दिवस राजसभेमध्ये महायोगी सर्वमान्य व नित्य तरुण सनकादि चार महामुनींनी प्रवेश केला. राजानेही त्यांचा योग्य असा अतिथिसत्कार केला. राजाने हे मुनि स्वतः आपण होऊन आपल्या दर्शनार्थ आले ह्मणून आपण अतिनम्रभावाने आपल्या धन्यजन्मत्वाबद्दल धन्यवाद गाइला. हा स्तुतिवाद झाल्यावर राजाने सनकादिकांस सांगितले की, 'महाराज' अनेक वर्षे राज्यभोग भोगून मला कंटाळा आला आहे. तेंव्हा माझी अशी विनंती आहे की, आपण कृपाळू होऊन मला शांतियोग समजून द्या.' ही विनंती ऐकून कुमारास अत्यानंद झाला व त्यांनी राजास ब्रह्मस्वरुपाचा उपदेश करून गणेशयोगाचा मार्ग दाखविला. राजाला आनंद झाला व पुत्रावर राज्यभार सोपवून त्याने वनांत जाण्याचा संकल्प केला. सनकादि कुमारही त्याला आशीर्वाद देऊन गणेशभजन करीत करीत अदृश्य झाले. पृथुराजाने राज्यत्याग केला व पत्नीसह अरण्यात राहून तेथे योगक्रमाने गाणपत्य झाला व अंती मोक्षपद पावला.

**सूत** :– शौनकादि ऋषीहो, नंतर मुद्गलांनी प्राचीनबर्हिषी नामक पृथुपुत्राची कथा दक्षास सांगितली. त्या कथेचे रहस्य इतकेच आहे की, पश्वादिकांची हिंसा करून अनेक यज्ञ केले, तथापि दुसऱ्या जीवांस हे यज्ञ प्राणघातक होतात, ह्मणून ते यज्ञही बद्ध होतात. त्यापेक्षा जीवाने ज्ञानसंपादन करावे, वेदांमध्ये जे अनेक ब्रह्मप्रकार सांगितले आहेत, त्याचे आक्रमण यथाशक्ति करून शेवटी संयोगायोगात्मक जे स्वानंदनिवासी गणेशब्रह्म त्याची आराधना करावी, व तत्प्रसादाने गणेशरूप होऊन स्वानंदलोकी शांतिसुखांत राहावे. पुढे मुद्गल ऋषींनी चराचर सृष्टि

होण्याच्यापूर्वी नारदांनी प्राचेतसाचे पुत्रांस गाणेशयोग कसा सांगितला व त्यास संसारांतून कसे निवृत्त केले हे सांगितले व सृष्टिक्रम सांगितला. हा सृष्टिक्रम सांगितला. हा सृष्टिक्रम सांगत असता ओघानेच कश्यपाच्या दिति, अदिति, विनता, कद्रु इत्यादि स्त्रियांपासून दैत्य, देव, गरुड, अरुण, सर्प इत्यादि कसे निर्माण झाले. पुलस्त्यवंशांत रावणकुंभकर्णाचा जन्म होऊन त्याचा रामाने वध केला व वसिष्ठांनी तपोबलाने गणपतिप्रसन्नता करून घेतली इत्यादि गोष्टी दक्षाच्या स्मरणार्थ मुद्गलांनी सांगितल्या.

## गजासुराचे त्रैलोक्याधिपत्य व पराशराच्या पोटी गणपतिचा अवतार–गजासुरवध व मोक्ष

इतके कथानक झाल्यानंतर वसिष्ठांचा नातु पराशर याच्या तपश्चर्येचे वर्णन करून मुद्गल ह्मणाले:– ‘पराशराने एकाग्र मनाने व ज्ञानपूर्वक जी तपश्चर्या केली, ती सफल होऊन गणराज प्रसन्न झाले. पराशराने देवापाशी अखंडभक्तिचे मागणे मागितले व ‘माझ्या घरी आपण पुत्ररुपाने अवतार घ्या, ह्मणजे भक्ति करावयास व आपले लालनपालन करण्यास मला पुष्कळ अवसर सांपडेल आणि माझ्या मनाला स्थिरता येऊन मला, माझ्या पत्नीला व आमच्या संसाराला ब्रह्मत्व येईल. आपण दयाळू आहां, सर्व सृष्टिस्थितिलयांची कामें आपल्या इच्छेनुसार होतात, ब्रह्मादिकांचे गुरु आपण आहांत, आपण भक्तकामकल्पद्रुम आहांत, कृपा करा आणि माझी ही इच्छा पूर्ण करा’ अशी प्रार्थना केली. श्रीगणपति ह्मणाले: ‘तुझ्या सर्व इच्छा सफल होतील गजासुराला मारण्यासाठी मला अवतार घेणे आहे व त्यावेळी तुझाच पुत्र होऊन मी हे धर्मकार्य करीन’ असे ह्मणून परमेश्वर अंतर्धान पावले व श्रीपराशरमुनीही पत्नीसह आनंदाने स्वगृही गेले.

असो; आता गजासुर कोण होता, ते सांगतो ऐक. गजासुर हा महिषासुराचा मुलगा. आपल्या बापास देवीने मारले ह्मणून तो देवीचा व देवांचा द्वेष करी. पितृवधाचा प्रतिशोध करण्यासाठी ह्मणजे देवांचा नाश करण्यासाठी त्याने शंकराची हजार वर्षे पंचाक्षरी मंत्र जपून तपश्चर्या केली आणि भोळा शंकर प्रसन्न झाल्यावर त्यापाशी वर मागितला की 'मला ब्रह्मांडाचे राज्य असावे व ब्रह्मांडांतील कोणत्याही प्राण्याच्या हातून माझा वध होऊ नये.' याला 'तथास्तु' ह्मणून शंकर अंतर्हित झाला. वरप्राप्ति झाल्यावर गजासुर घरी आला व आपल्या इष्टमित्रांकडून उत्तम प्रकारचे स्वागत झाले. पुढे सर्व दैत्यमंडळ एकत्र जमले व त्रैलोक्य जिंकण्याचा संकल्प केला. त्यांनी प्रथम शुक्रहस्ताने गजासुरास राज्याभिषेक करून घेतला. नतर पृथ्वी, स्वर्ग, पाताल, या लोकांत अंमल बसवून सर्व दैत्यांनी कैलासावर स्वारी केली. व युद्धांत शंकराचा पराजय करून त्यास व इतर देवांस स्वर्गातून हाकलून दिले. निरुपाय होऊन ते अरण्यात गेले आणि विष्णूने सुचविल्याप्रमाणे स्वानंद वासी गणपतीची एकनिष्ठ तपश्चर्या करू लागले. तो दीनदयाळू भगवान तेव्हांच प्रकट झाला व 'भिऊ नका, पराशराच्या उदरी पुत्ररूपाने येतो व गजासुराचा वध करतो; देव हो! माझ्या ठिकाणी तुमची भक्ति अखंड असो.' असा आशीर्वाद देऊन स्वलोकांस गेला. इकडे नारद हा गजासुराच्या सभेत देवांस गजाननाने दिलेल्या वरांचा वृत्तांत सांगता झाला ते ऐकून खवळलेला गजासुर देवांस ठार मारण्यासाठी अरण्यांत गेला, पण गणेशकृपेनें गजासुराचा बेत सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां त्यानें देवांस सांगितलें कीं "तुम्हीं दोन्ही हातांनीं आपले दोन्ही कान धरून माझ्या चरणांवर

मस्तक आपटून व साष्टांग नमस्कार करण्याचें सर्वजण कबूल करींत असाल, तर तुम्हांस जिवंत ठेवतो, त्या वक्रतुंडास सुद्धां घेऊन या, खबरदार नाहीं आला तर!" तसें करण्याचें विष्णुप्रमुख देवांनीं कबूल केलें, व गजाननाकडे जाऊन त्यास ही हकीकत सांगितली. देव किती दीन झाले आहेत हे पहाण्यासाठी 'गजासुराने सांगितल्या-सारखा नमस्कार मला भाक्तिपूर्वक करा' असें गणपतींनीं म्हटलें मात्र तो सर्व देव गर्वशून्यवृत्तीनें व एकनिष्ठ भक्तीने गणपतीस वंदन करिते झाले. देवांचा साह्यकर्ता श्रीगणेश देवकार्यासाठी नित्य सिद्धच असावयाचा. त्याप्रमाणें श्रीभगवान् देवांसह गजासुराच्या नगरीवर चालून गेले, तेथे देवदानवांचे अति घोर युद्ध झाले. देवांनी पुष्कळ वेळ टिकाव धरला, पण गजासुराच्या अद्वितीय हस्तलाघवापुढे त्यांचें काही चालेना. तेव्हां श्रीगणेश स्वतः युद्धसन्मुख झाले. अर्थातच गजासुराचे युद्धकौशल्य लुप्तप्राय झाले. मग तो मल्लयुद्धास तयार होणार असे पाहून भगवंतांनीं आपले विश्वरूप त्याला दाखविले. ब्रह्मांडाहून ते निराळे, हाताने न धरतां येणारे, व सर्व व्यापी स्वरूप पाहून गजासुर भयाने गांगरला, भक्तीने सद्गदित झाला, बुद्धीने नम्र झाला आणि त्याने एकदम गणपतींची स्तुति करण्यास आरंभ कला. शेवटी त्याने मागणें मागितले की ' मला आपल्या परशूनें ठार करा म्हणजे मी पापमुक्त होईन " गणपतींनीं त्याचें तें भक्तिपूर्ण प्रेम पाहून त्याच्या म्हणण्यास रुकार दिला व त्याप्रमाणे दैत्यास मारून देवांस सुखीकरून व मातापितरांचे समाधान करून ते स्वानंद-वासी झाले.

## शुककथा–च्यवन ऋषीची कथा–मदासुराचा जन्म व तपश्चर्या–मदासुर ब्रह्मांडाचा स्वामी होतो– मदासुराचा उद्धार

**सूत :-** ऋषींहो ? व्यासांनें वेदांचीं व्यवस्था लावून यजुर्वेद्यांकडे अध्वर्युत्व, ऋग्वेद्यांकडे होतृत्व, सामवेद्यांकडे उद्गातृत्व व अथर्ववेद्यांकडे ब्रह्मत्व दिले, तसेच वैशंपायनाकडे यजुर्वेद, पैलाकडे ऋग्वेद, जैमिनी-कडे सामवेद व सुमंतूकडे अथर्ववेद देऊन व पुराणें रोमहर्षणनामक सूताकडे देऊन अठरा पुराणें व अठरा उपपुराणें व्यासाने निर्माण केलीं, भारत हा उत्तम इतिहास, धर्माधर्म व्यवस्थेसाठी केला व " ह्या वेदादि सर्व ग्रंथांत तात्पर्याने ' गणेशस्तुति ' आहे, हे समजून त्यांचे पठण करावें " असें आपल्या शिष्यांस सांगितले झाला; इत्यादि वर्तमान जगद्विख्यातच आहे. तो गणेश ॐकाररूप आहे म्हणून त्याचें प्रथम व अंतीं व मध्यें ध्यानासहित पूजन करावें. असोः या व्यासाचा मुलगा शुक मातेच्या उदरातून बाहेर पडला तो पळतच सुटला. पुत्रमोहाकुल व्यासानें पुष्कळसा सांसारिक बोध केला पण ' संगति झाली म्हणजे संसार उत्पन्न होतो ' ही शुकाची समजूत होती म्हणून मुलानें बापाचें ऐकले नाहीं. मुलगा नर्मदातीरी गेला व तेथे तपश्चर्या व ब्रह्मध्यान करू लागला. पुढें शंकर प्रगट होऊन त्यानें व नंतर जनकाने शुकास योगमार्ग सांगितला. तथापि चित्ताला शांति मिळेना. शेवटीं बापाकडे शुकयोगींद्र आला व व्यासानें मुलाला गणेशयोग सांगितला, तो स्वीकारून शुकाने त्या योगाचे आचरण केलें व अखंड शांति मिळविली.

**सूतः**- शौनका! काशीस मरुत्त राजा होता. त्यानें इंद्राच्या व बृहस्पतीच्या मताविरुद्ध गणेशभक्त संवर्त याचें साह्य घेतले व यज्ञ करून मुक्त झाला. त्याची कथा, भयंकर दुष्काळ पडला असतां गणपतींच्या वराने अन्नसंतर्पण करून दुःखनिवारण करणाऱ्या व अन्न खाऊनही आपल्या यजमानाचा छळ करणाऱ्या ब्राह्मणांस शाप देणाऱ्या गौतमाची कथा, याच द्विजांस मोहित करणारी पाखंड शस्त्रें निर्माण होऊन पापी द्विजांस अज्ञानात ढकलण्याची, त्याचप्रमाणे कश्यप-दितिपुत्र जे हिरण्याक्ष, हिरण्य-कशिपु यांची कथा दक्षास सांगून मुद्गल ह्मणाले नरहरीचा जो प्रथम पराभव झाला तो त्याने श्रीविघ्नेशस्मरण केले नाही ह्मणून झाला. पण गणेशभक्ति केल्यावर विष्णुरुपी नरहरीला शत्रुमर्दनाचें सामर्थ्य आले व विष्णुरूपी वराहाला हिरण्याक्षाचा वध करता आला. या उभयतांनी पृथ्वीवर गणपतीची स्थापना करून तद्भक्तीचा संप्रदाय वाढविला. असो; प्रल्हाद, महाविष्णुभक्त, पुष्कळ-दिवस विष्णूचे एकनिष्ठेने आराधन करीत होता, पण काही संगती-दोषामुळे विपर्यास घडून तो विषयासक्त व विष्णु-विन्मुख झाला. तथापि त्याचे पूर्वसंचित बलवत्तर होते ह्मणून त्याच्या येथे गृत्समदऋषि आले. त्या पुण्यपुरुषाचे दर्शन झाल्याबरोबर प्रल्हादास पश्चात्ताप झाला व 'मला ज्ञान सांगा व भवसागरांतून तारून न्या' अशी करुणस्वराने ऋषींची त्याने प्रार्थना केली.

**गृत्समद**:- प्रल्हादा! तुझ्या हृदयांत मदाचो वसति आहे; ह्मणून तुला मदासुराचो कथा सांगतो त्या कथेवरून तुला ज्ञानप्राप्ति होऊन मोक्षाचा मार्गही कळेल. ऐकः-एकदा एक राक्षस भृगुऋषि नाहीत असे पाहून त्यांच्या आश्रमात गेला व त्यांच्या पत्नीजवळ ह्मणजे

सुलोमेजवळ जाऊन ह्मणाला: ‘ सुलोमे ! तुझ्या बापाच्या मनांत मला जावई करावयाचे होते, पण भृगूने तुझी मागणी केली ह्मणून त्याचा बेत फसला. असो; आतां मी तुझे हरण करतो ’ नतर त्याने अग्नीला प्रत्यंतरासाठी बोलाविले. दोन तीन वेळ तोच प्रश्न विचारल्यावर अग्नीने सांगितले की, ‘ हिच्या बापाचा निश्चय तुला ही मुलगी द्यावी, असा होता. असो; आता ही भृगूची पत्नी आहे, हिचे हरण करू नको. ही महापतिव्रता आहे. ’ राक्षसाने कोणाचेही न ऐकता त्या रडणाऱ्या गर्भवती सुलोमेस हट्टाने घेऊन जाण्याचे काम आरंभिले. पण इतक्यांत आतील गर्भ संतप्त होऊन बाहेर आला व त्या पापी राक्षसाला जाळून भस्म करिता झाला. हा राक्षसहंता गर्भ मातेच्या उदरांतून च्युत झाला म्हणून त्याला च्यवन म्हणतात सुलोभा, त्याची आई, रडत गेली व भृगूस तिने सर्व वृत्तांत सांगितला पुढें त्याने ‘ तूं सर्व भक्षक होशील ’ असा अग्नोला शाप दिला. तेव्हा अग्नि रुसला पण ‘ विनायकाव्यतिरिक्त एक काटीही जाळण्याचे तुला सामर्थ्य नाहीं. व्यर्थ गर्व न करतां जे जे भक्षण त्यांस पवित्र करून विनायकपूजा कर ’ असे त्याचे देवांनीं समाधान केले. तोही विनायक-भक्ति करून स्वानंदयोगाचा लाभ घेता झाला. तसेच त्याने ‘ काही खाल्ले तरी त्याचे अमृतच व्हावे ’ असा त्यास गणपतींनी वर दिला इकडे च्यवन ऋषीने वडिलांची आज्ञा घेतली व मोठी घोर तपश्चर्या जलामध्ये बसून आरंभिली. पुढें दैवयोगाने धीवरांच्या जाळ्यात सांपडून त्यास नहुषराजापुढे जावे लागले. नंतर त्यास धीवरापासून सोडविण्यासाठी राजाने सर्व राज्यावर उदक सोडण्याचे मनात आणले. पण च्यवनाचे समाधान होईना. तेंव्हा गणपतिभक्त भरद्वाजाने राजास शहाणपण शिकविले व ‘ एक गाय हेच तुझे मोल आहे ’ असे

म्हणून च्यवनाची सुटका व समाधान केले. पुढें, च्यवन ऋषि राजास पुष्कळसे आशीर्वाद देऊन पुनः वनामध्ये तपश्चर्या करण्यास गेला. हजारवर्षे तपश्चर्येला झाली, अंगावर वारुळे वाढली, गवतही सपाटून वाढले. याप्रमाणे वारुळाने व गवताने आच्छादिलेला हा ऋषि तपोबलाचा संचय करीत असतां तेथे मृगयेकरितां आलेल्या शर्याति राजाच्या कन्येनें कौतुकाने 'वारुळांत माणकासारखे काय लक्का-कत आहे, तें पहावें.' ह्मणून आंत कांटे घालून पाहिले व रक्त लागलेले पाहून ती घाबरली. तिच्या या पापाने सर्व सैन्यांतील लोकांची पोटे फुगली. या अनर्थाचा शोध करतां, मुलीने आपले अपकृत्य बापास सांगितले व बापाने मुलीला वारुळाच्या बाहेर काढलेल्या ऋषीच्या पायांवर घातली. च्यवनाने तिचे पाणिग्रहणच केले. तिने त्या अंध ऋषीची सेवा उत्तमोत्तम रीतीने केली. ऋषि प्रसन्न झालेच, पण अश्विनीकुमार देवही प्रसन्न होऊन त्यानी च्यवनास तारुण्य, आरोग्य व चाक्षुषत्व ह्या वस्तु दिल्या. हा सर्व वृत्तांत ऐकून शर्याति राजास हर्ष झाला. व जांवयास व मुलीस घेऊन तो स्वनगरीत आला. नंतर राजाने एका यज्ञाला आरंभ केला व त्यांत तो आपल्या उपकारकर्त्या अश्विनीकुमारास यज्ञभाग देऊं लागला. तेव्हा त्याच्या आड इंद्र आला. ह्या इंद्राचा पराभव करण्यासाठी स्वतपाच्या बलाने च्यवनाने एक महाभयंकर व काळा-कुट्ट असा 'मद' नावाचा राक्षस उत्पन्न केला. ते त्याचे अक्राळ-विक्राळ स्वरुप पाहून यज्ञार्थ आलेले देव व ऋषी भिऊन दश दिशाला पळून गेले इंद्र मात्र च्यवनऋषीस शरण गेला व 'अश्विनी-कुमारांस यज्ञहवीचा भाग देतो' असे कबूल करून आपली सुटका करून घेता झाला. यज्ञ समाप्त झाल्यावर च्यवनमुनि स्वभार्येसह

पित्याच्या ह्मणजे भृगुऋषीच्या आश्रमास गेला. बापास अर्थातच आनंद झाला. पुढे महासुराच्या जन्माला कारण जो च्यवन ऋषीचा गर्व तो भृगूच्या दृष्टोत्पत्तीस आला. तेव्हा त्यास वाईट वाटले. पण त्याने एक खासा उपाय केला. त्याने ब्रह्मा, विष्णु, महेश या तिघांच्या मोठेपणाचे माप घेऊन सर्वांचा गर्व हरण केल्याची व विष्णूला आपण लत्ताप्रहार केला असतांही त्याने शांतपणा धरून आपले पाय चुरुं लागल्याची कथा सांगितली व 'क्षमा हे मनो-धैर्यांचे मुख्य शस्त्र आहे. क्षमेचा सर्वत्र विजय होतो' असा पुत्रास उपदेश केला. शिवाय, ऋषीहो ! दक्षयज्ञांत गणेशविस्मरणामुळे आपले हाल झाले, आपल्यास मेंढ्याची हनु व वारुणीत्व प्राप्त झाले, गणेशविस्मरणाचे वाईट परिणाम झाले, सर्व देवतांस गणपतिविस्मृतीने जलरुप प्राप्त झाल्यावर देवांगनांच्या गणेशभक्तिने त्यास पूर्व-स्वरुप मिळाले व आपण गणेशभक्त झालो, हा सर्व वृत्तांत भृगूने आपल्या पुत्रांस कथन केला. 'मुला !' भृगु ह्मणालाः 'गणेश-ज्ञानाने, तद्भक्तीने व तद्योगाच्या साह्याय्याने माझा मद नष्ट झाला व शांति मिळविली, तूंही गणेशभक्ति कर; तुम्हाही तेच फळ मिळेल.' नंतर भृगूने आपल्या मुलास गणेशयोगाचा उपदेश केला, व मुलाने बापाच्या उपदेशानुसार श्रीगणेशभक्ति करून शांति मिळविली, आणि गणपतीची स्थापना करून गणेशभक्तिचा संप्रदाय वाढविला. इकडे च्यवनाने निर्माण केलेला मदासुर पातालांत गेला. तेथे त्याने शुक्रमुनीची गांठ घेऊन आपली जन्मकथा सांगितली व 'मला त्रैलोक्याचे राज्य हवे आहे, त्याचा उपाय मला सांगा.' अशी प्रार्थना केली. शुक्रांनी भक्तिमंत्राचे आवाहन–विसर्जन त्यास सांगून 'तपश्चर्येला जा' ह्मणून सांगितले. मदासुर गेला व उग्र व दारुण

तपश्चर्येच्या जोराने त्याने शक्तिदेवीला प्रसन्न करून घेतले व तिची स्तुति करून तिच्याकडून ' इष्टवर ' प्राप्त करून घेतले. ' ज्याची उत्पत्ति झाली आहे, त्यापासून तुला मरण येणार नाही व तुझ्या स्वाधीन पंचमहाभूतात्मक विश्व राहील ' असे वर देऊन देवी अंतर्धान पावली. नंतर मदाने लग्न केले व त्यास विलासी, लोलुप व धनप्रिय असे तीन पुत्र झाले. पुढे गुरुजींच्या अनुज्ञेने त्याने सप्तद्वीपवती पृथ्वीला पादाक्रांत करून स्वर्ग लोकावर स्वारी केली. मदासुराचा वृत्तांत ऐकून व तो येतो आहे असे पाहून देवांनी बृहस्पतीच्या उपदेशानुसार ' य: पलाय ' केले. देवांची इच्छेस येईल तेथे जाणारी विमाने घेऊन मदासुराने सर्व भोगांचा उपभोग घेतला. पुढे ब्रह्मादि देवत्रयाच्या लोकांवर हल्ले करून त्याच्यावर आक्रमण केले व त्यांस तेथून बाहेर काढले. सर्व देव शक्तिलोकास गेले व मदासुर-विक्रमाचा वृत्तांत देवीला सांगते झाले. देवीला वाटले, मदासुर आपला पोसणा आहे, आपल्या वाटेला जाणार नाही, गेलाच तर त्याचा समाचार घेण्याला काय उशीर आहे, असे मानून तिने देवांस अभय दिले व शक्तिलोकांत राहण्यास अनुज्ञा दिली. इकडे मदासुर व त्याचे अनुयायी कैलासलोकांचे सुख अनुभवित राहिले. पण सुख-विषयांचा कंटाळा येऊन अन्य विषय हवेसे वाटतात, त्याचप्रमाणे राक्षसांची अवस्था झाली. त्रिपुरादि राक्षसांनी मदास सांगितले की, ' देवांनीं आपल्याशी नित्य वैर केलें आहे, हिरण्यक्षादि आपले लाखों बंधु देवांनींच मारले, हे नेहमी आमचा पराभव करण्याची व आम्हांस पृथ्वीवरून व स्वर्गातून घालवून देण्याची योजना करण्यात

दंग असतात. आतां ते शक्तिलोकांत जाऊन राहिले आहेत, चला आपण जाऊन त्यांचा समाचार घेऊ.' 'शक्ति आपली, इष्ट देवता आहे. मी माझ्या देवतेविरुद्ध लढणार नाही इत्यादि काही आढेवेढे मदाने घेतले, पण वृद्धांनी त्याची समजूत घातली व सर्वांचा निश्चय झाला, की शक्तिलोकांवर स्वारी करावयाची. शक्तिलोकाला ससैन्य जाण्याच्यापूर्वी मदासुराने तारकासुर नामक दैत्याला शिष्टाईकरतां पाठविले. तो शक्तिलोकास गेला व तेथील सभेत त्याने मदासुराचा संदेश सांगितला. की, 'देवी! मी तुझा भक्त होय. तूं राक्षसांची कुलदेवता आहेस; म्हणून देवांचा पक्ष सोडून आमच्याकडे ये. आपण देवांचा नाश करूं' हा निरोप देवींस पसंत पडणे शक्य नव्हते. तिने प्रतिसंदेश पाठविला की, 'मीं जगदंबा आहे; मला सगळेच सारखे आहांत. तुम्हीं पातालांत सुखानें राज्य करावे व देवांनीं स्वर्गात करावें. हें मान्य करून तुम्हीं पाताळांत जा.' हा उलट निरोप तारकासच मान्य झाला नाही, मग तो मदादिकांस पसंत पडणे दूरच राहिले. त्याने कर्मांचा व बलाचा गौरव करून देवीचा निषेध केला आणि 'युद्धाची तयारी करा' हा निर्णय सांगून तो परत गेला पुढे राक्षसांनी शक्तिलोकावर स्वारी केली त्यावेळी अति भयंकर युद्ध झाले. देवदैत्यांनी आपआपली पराकाष्ठा नेली. जयापजयाची पारडी क्षणोक्षणी खालीवर होऊ लागली. रक्ताच्या नद्या, मांसाचा चिखल, कबंधाचे नाचणे, बाणांची छते व तज्जन्य भेसुर अंधकार हा सर्व चित्तभेदी प्रकार पाहून सर्व सैनिक तर गर्भगळीत झाले पण राक्षसांस शुक्राचार्यांचे साहाय्य होते, यामुळे त्यांच्या सैन्या-

तील मेलेले वीर पुनः जिवंत झाले व युद्ध करू लागले. देवांस
पुनः जिवंत करणारा कोणी नव्हता. यामुळे राक्षसांचा पक्ष जोरा-
ऊन तो मदासुराच्या हस्तकौशल्याने विजयश्री बळकाविता झाला.
मदासुराच्या मुलांनीही त्या संग्रामात सूर्य, विष्णु व शंकर यांचा
पराभव केला व त्यांस घेऊन ते वडिलांच्या पाया पडण्यासाठी
गेले. नंतर शक्तिचे व मदासुराचे तीन दिवस लोकोत्तर युद्ध झाले.
शेवटी शक्तिचा पराभव झाला व ती मदासुराच्या हस्तगत झाली.
याप्रकारे मदासुराचे राज्य सर्व ब्रह्मांडावर झाले. त्याला कोठेही
शत्रु उरला नाहीं. नंतर राक्षसांनी वैदिकधर्मांचा नाश करण्यासाठी
वेद व त्यांचे पठण करणारे भिक्षुक यांचा नाश करण्यास आरंभ
केला. अर्थातच वेद व वेदवेत्ते व वेदकर्में लुप्त झाली. स्वार्थी कर्म
वृद्धिंगत झाले. परोपकाराचे कर्म अस्तंगत झाले. यामुळे देवांस उपास
पडू लागले. तेव्हा देवांनी सनत्कुमाराचा उपदेश घेतला, मंत्रतंत्र पुरस्सर
गणेशभक्ति भक्तिभावाने केली, त्याचे एकनिष्ठ ध्यान केले, गर्वाचा व
मदाचा त्याग केला, 'एक' ह्मणजे माया व 'दंत' ह्मणजे सत्ता, अर्थात्
एकदंत ह्मणजे मायेचा आधार व मायातीत जो गणपति त्याची त्यांनी
वेदविहित मार्गांने स्तुति केली व निराहाराचे व्रत पाळले. याप्रमाणे
शंभरवर्षे अव्यभिचारी तपश्चर्या विघ्नेशाचे कृपेने निर्विघ्नपणे सिद्धीस
गेल्यावर तो भक्तकामकल्पद्रुम श्रीगणपती प्रसन्न व प्रकट झाला व
भक्तांस इष्ट वरांचा आशीर्वाद देऊन स्वानंदवासी झाला. ही बातमी
नारदाने मदासुराला कळविली. मदासुराने गणपतीच्या नाशाचा संकल्प
करून आपले चतुरंग सैन्य सज्ज आहे, असे पाहिले. इतक्यात
श्रीगणपतीची स्वारी तेथे 'दत्त' ह्मणून उभी राहिली, व 'एकदंत,
स्वानंदवासी गणपति मी सर्वेश्वर आहे. तुला मारण्यासाठी, देवांस सुख

देण्यांसाठी, अधर्मांचा नाश करून सद्धर्मांचा प्रसार करण्यासाठी मी अवतरलो आहे. एक शरण तरी ये अथवा युद्धास तरी तयार हो ' असा दूताच्या हाती निरोपही गणेशाने पाठवला. नंतर युद्धाच्या तयारीने दैत्यराज बाहेर आला व लीलेसाठी गजवदनांनी त्याच्याशी थोडा वेळ युद्ध केलेही. पण लवकरच मदासुराला आढळून आले की, निराकार, निर्गुण, प्रकृतीच्या पलीकडचा व तिचा अध्यक्ष जो गणपति त्याच्याशी युद्ध करणे व्यर्थ आहे. शिवाय श्रीपरमेश्वर-दर्शनाने त्याचा मोह, त्याचा गर्व, त्याचे अज्ञान, यांचा नाश होऊन तो परमेश्वरचरणी लीन झाला, त्याला ज्ञान झाले व तो कृतार्थही झाला. त्याने देवांशी वैर न करण्याचे कबूल केले; व श्रीदेवापासून असा वर मिळविला की, ' सकाम भक्ति अथवा कर्म दिसेल तेथे त्या भक्तिकर्मफलाचे भक्षण करून सकाम भक्तांच्या व कर्त्यांच्या हृदयांत वास्तव्य कर ह्मणजे ते मदयुक्त होतील व जेथे निष्कामत्व दिसेल तेथे शांतिरुप हो ह्मणजे त्यांची शांति वाढेल. ' असा वर देऊन गणपति स्वस्थानी गेले, देव व दैत्यही आपआपल्या स्थानी जाऊन शांतिसुखाचा अखंड अनुभव घेते झाले.

## कश्यपाच्या घरी विनायकावतार–बाललिला–काशियात्रा राक्षसवध–भृशुंडी–आशापूरक

**सूत** :– ऋषींनो ! गौडदेशामध्ये गौड या नावाचे एक नगर होते, तेथे रौद्रकेतु व शारदा या नावाचे ब्राह्मणदांपत्य सुखाने राहात असे. त्यास देवांतक व नरांतक या नावाचे एक भयंकर जुळे झाले. मुले मोठी झाली, तेव्हां नारदाने त्यास पंचाक्षरी शिव-मंत्राचा उपदेश केला व त्यास तपश्चर्या करण्यास सांगितले. त्यांनी

जी तपश्चर्या केली ती पाहून शिव प्रसन्न झाले 'गुण व रूप ही ज्या वस्तूस आहेत, तिच्यापासून तुह्माला भय नाही' हा वर दिला. झाले! पुढे, हे ब्राह्मणरुपी दैत्य प्रबल होऊन त्यांनी त्रैलोक्य पादाक्रांत केले. देवधर्म अर्थातच राहिले. कोठेही स्वाहा, स्वधा, वषट्कार यांस आश्रय राहिला नाही, त्यामुळे देवांस अन्न मिळेना. मग त्यांनी गणपतीची आराधना केली व त्यास प्रसन्न केले. 'कश्यपाचे घरी अवतार घेऊन मी तुमचे संकट दूर करतो' असा देवास गणपतीने वर दिला. कश्यपाचे घरी देवांस जन्म घ्यावयाचा होताच. कारण देवमाता अदितीला 'ब्रह्म आपल्या उदरी यावे व पुत्ररूपी देव होऊन आपण त्याची सेवा, चाकरी करावी' अशी इच्छा उत्पन्न झाली व गणपतीची आराधना करून तिने आपली मनकामना पूर्ण होईल असा वर मिळविला. पुढे गणपतीचा अवतार झाला. बाळपणी विघ्नेशांनी अनेक प्रकारची क्रीडा केली. व पुष्कळ खोड्याही केल्या. एकदा एका राक्षसीने गिळल्यावर तिचे पोट फोडून देव बाहेर आले, उद्धत व धुंधु या शुकरूपी राक्षसास त्यांनी मारले, इंद्राच्या गर्वाचे हरण करून वायु, अग्नि यांचाही पराभव केला, काशीस जातांना अनेक राक्षसांचा संहार केला, काशीत विनायकाचे सिद्धिबुद्धीशी लग्न झाले, इत्यादि बाललिलांनी विनायकाने स्वमातापितरांचे ठायी व भक्तजनांचे ठायी महाकौतुकाने उत्पन्न केले, एकदा काशीराजा पूजा करण्यास आला तो विनायकाची षोडशोपचार पूजा झालेली त्याला दिसली. ही भृशुंडीनामक भक्ताने पूजा केली आहे, असें समजतांच त्याला राजाने बोलावणे पाठविले; पण तो येईना. कारण शुंडाधरगणपतीशिवाय कोणासही मी नमस्कार करावयाचा नाही, असा भृशुंडीचा निश्चय होता. राजा स्वतः गेला, पण व्यर्थ. पुढें, विनायक शुंडाधर झाले हे

ऐकून योगसामर्थ्याने राजास घेऊन भृशुंडी काशीक्षेत्रांत आला. नंतर भृशुंडीने भक्तिपुरःसर विनायकाची स्तुति केली, व 'आशापूरक' या नावानें प्रसिद्ध हो व मला पूर्ण भक्त कर' म्हणून गणपतीपाशी मागणे मागितले व विनायकाने 'तथास्तु' म्हटले.

## भृशुंडीचें पूर्ववृत्त व पश्चात्ताप–सूर्यपत्न्या छाया व संज्ञा यमकृत गणेशस्तुति– गणेशप्रसाद– भृशुंडी भक्ति व ब्राह्मणत्व

सूतः- शौनकादि मुनींहो ! 'हा भृशुंडी कोण ?' असें विचाराल तर मुद्गलाने दक्षास सांगितले ते सांगतोः पूर्वी नंदुरगांवी 'नामा' या नावाचा एक दुष्ट व्याध राहत असे. हिंसा, वाटमारी, चोरी करून पोट भरावे हा त्याचा धंदा असे. तो एकदा एका गृहस्थाच्या पाठीमागे धावता धावता थकला व विश्रांति घ्यावी ह्मणून एका तळ्यावर उतरून तेथे त्याने स्नान केले. स्नान करून बाहेर आला तो त्यास उपरति झाली व त्याने आपला क्रम सोडून दिला. या तळ्याचा हा प्रभाव होय. याची हकीकत अशीः पूर्वी सूर्यास संज्ञेपासून वैवस्वतमनु, यम आणि यमुना ही अपत्ये झाली. पण संज्ञेला सूर्यतेज सहन होईना; ह्मणून तिने छायेला उत्पन्न केले व आपण रागाने निघून गेली; छायेवर सूर्याचे प्रेम जडले व तिच्या उदरी सावर्णिमनु, शनि आणि तापी यांचा जन्म झाला. छाया आपल्या सावत्र मुलांस छळित असे ह्मणून एकदा यमाने तिला लाथ मारिली, तेव्हां 'तुझा पाय किडे पडून गळून पडेल' असा छायेने यमाला शाप दिला. नंतर यमाने गणेशभक्ति करावी असे नारदाने ठरविले इकडे सूर्याने अश्वरूप घेऊन अश्विनीचे रूप घेतलेल्या संज्ञेला वश करण्याचा प्रयत्न केला; त्यावेळी अश्विनीकुमाराची उत्पत्ति

झाली. व सूर्य आणि संज्ञा यांचे पुनः प्रेम जडले. यमाने गणेशाची उत्तम स्तुति केली व अखंड भक्ति मिळविली तसेच ' तुझ्या पायांत एक महिनाभर किडे पडतील व नंतर तो बरा होईल, मातृशाप कोणालाही निवारण करतां यावयाचा नाही, माझी भक्ति कर, तुला दुःख होणार नाही. तूं दक्षिण दिशेचा स्वामी होशील व यमधर्म असे तुला ह्मणतील, असा गणपतीने वर दिला. शिवाय ज्या तळ्यांत यम नित्यशः स्नान करी, त्या तळ्यांत स्नान केले असतां जीवास पश्चात्ताप होऊन तो पापविन्मुख होईल, असा त्या तळ्यालाही वर दिला. असो; ज्या गृहस्थाच्या ह्मणजे मुद्गलाच्या मागे धांवतां धांवतां, हा नामा थकला होता, त्या ऋषीस नामा व्याध लागलीच शरण गेला. ऋषीने कृपायुक्त होऊन त्यालाही गणेशमंत्राची दीक्षा देऊन सांगितले की ' ही माझी शुष्क काठी येथे मी ठेवतो, तिला अंकुर येईपर्यंत जपपूर्वक तपश्चर्या कर. वायु मात्र भक्षण कर; तुझे कल्याण होईल. ' मुद्गलाने सांगितल्याप्रमाणे नामाने हजार वर्षे तपश्चर्या केली व तो पापमुक्त झाला. त्याचा पुण्यसंचय इतका झाला की, त्याला सोंड फुटलीं ! त्याची तपश्चर्या फलोन्मुख झाली, तेव्हां मुद्गल येऊन त्यांनी त्याला वारुळाबाहेर काढला व त्याला आपला पुत्र करून ह्मणजे ब्राह्मणत्व देऊन त्याचे नाव भृशुंडी ठेविले. पुनः त्याला एकाक्षरी गणेशमंत्र दिला व त्याचा जप करून गणपतिप्रसन्नता संपादिली आणि अखंड भक्तीचा वर मागून घेतला. जेथे भृशुंडीने तपश्चर्या केली, त्या आश्रमाला ' आमलाश्रम ' असे नांव मिळून ती जागा एक पुण्यक्षेत्र झाले. तेथेच मानसपूजा करीत भृशुंडी पुष्कळ दिवस राहत असे. असो; भृशुंडीच्या दर्शनाने काशीराजाही परम शांति पावला. पुढे श्रीविनायक काशीक्षेत्रांत राहून व पुष्कळशा राक्षसांस मारून सर्वांस आपल्या प्रसादाचा लाभ देत

असतां एकदा शुक्लनामक गरीब ब्राह्मणाने ' भाजी भाकरी ' खाण्यास बोलाविले ह्मणून काशीराजाचे आमंत्रण टाकून त्या गरीबाच्या येथे देव गेले व त्यावर अनुग्रह करून त्यांनी त्याला चिंतामुक्त केले. पुढे नरांतकाने काशीवर स्वारी केली तेव्हां विनायकानें एक गण पाठवून नरांतकाला धरून आणले. त्याच्याशीं व इतर दैत्यांशी युद्ध करून त्यांचा सपराभव वध केला व काशीक्षेत्रात ' ढुंढी ' राज या नावाने प्रसिद्ध होऊन, सर्व लोकांस शांति मिळणारे ज्ञान देऊन, कश्यपासह अदितीला सर्व प्रकारचे सुख देऊन व भूभार हरणाचे अवतारकृत्य संपवून विनायकराज स्वानंदवासी झाले.

## दुर्मति आख्यान–शिवसुतला–शनिदुःखविमोचन दुर्मतिवध

सूत :– मुनिगणहो ! शकुनिनामक राक्षसाला दुर्मति नावाचा एक महापराक्रमी मुलगा झाला. त्याने शक्तीची आराधना करून विलक्षण वर मागून घेतले. नंतर या वरसामर्थ्याने त्याने विष्णुप्रमुख देवांचा पराभव केला इतकेच नव्हे तर शक्तीला ' माझी भार्या हो ! ' अशी उर्मट मागणी केली. तेव्हां भीतीमुळे शंकरासह शक्तीने वनवास पत्करला व नारदाच्या सांगण्यावरून श्रीगणपतीचे १०० वर्षे आराधन केले. देव प्रसन्न झाल्यावर ' पुत्र हो व दुर्मतीचा वध कर ' असा वर मागितला, तो मिळवून शिव व पार्वती हे दांपत्य तेथेच राहिले. पुढे, वैशाखमासांत शिवपार्वतीनी वैशाखस्नान करून एक मातीची गणेशमूर्ति केली व तिचे ध्यान केले व सोपचार पूजा केली. तेव्हां त्या भक्तीने प्रसन्न होऊन ती मूर्ति जिवंत झाली व ' मी तुमचा पुत्र होऊन आलो, माझे रक्षण करा ' असे ह्मणाली. अर्थातच गणेश मायेने शिवास मोह झाला व मातेला पान्हा फुटला. पुढे जातकर्मादि संस्कार होऊन गणपति वयात आल्यावर विष्णूने आपली पुष्टिनामक मुलगी

देऊन गणपतीस जावई केले. लग्नसभारंभांत सर्व देव स्वस्वस्त्रियांसह आलेले होतेच. त्यांत शनिग्रह होता. त्याने गणेशस्तुति केली पण डोळे मिटून केली तो कांही केल्याने डोळे उघडीना. तेव्हां पार्वतीने 'असे कां ?' ह्मणून विचारले शनीने सांगितले, 'मांतुश्री ! एकदां मी सूर्याचे आवाहन करून त्याचे ध्यान करीत असतां माझी बायको तेथे आली व 'मला ऋतुदान द्या' असे ह्मणाली. मी ध्यानस्थ, डोळे मिटलेला, काही बोलत नाही, असे पाहून तिने शाप दिला की 'तूं मला ऋतु दान केले नाहीस, ह्मणून तुझी दृष्टि ज्याच्यावर पडेल त्याचे वाटोळे होईल' या शापाचा अनुभव आल्यापासून मी डोळेच उघडीत नाही. ह्मणुन आतांही मला आग्रह करूं नका.' पण पार्वती ह्मणाली की 'सर्व मंगलप्रद ब्रह्म येथे आहे, खुशाल डोळे उघड !' शनीने डोळे उघडून पाहिले तो क्षणैकांत विनायकाचे शिर दिसेनासे झाले ! सर्व मंडळी घाबरली. पुढे नवस वगैरे करणार तो पुनः गणेशाचे शिर दिसू लागले. अर्थात् सर्व मंडळी आनंदली. शनीने गणनाथाची स्तुति केली. तेव्हां गणपति ह्मणाले : 'तूं ज्याकडे क्रूरदृष्टिने पाहशील, त्याचा मात्र नाश होईल.' नंतर शनीने गणेशयोग संपादिला व गणेशपूजन करून तो शांति मिळविता झाला. असो; एक दिवस गणेशदेवांनी शंकरास विचारले की 'तुह्मी सर्व देव वनांत कां राहतां ?' नंतर शंकराने दुर्मति राक्षसाचा वृत्तांत सांगून आपल्यास वनवास कां प्राप्त झाला हेहि सांगितले. हे ऐकून पुष्टिकांतांनी युद्धाची तयारी करण्यास सांगून देवसैन्य दुर्मतीच्या नगरीवर पाठविले. सात दिवस घनघोर युद्ध झाले. शेवटी शेवटी गणेशाचा एक दांत दुर्मतीने उपटला होता, तोच दात घेऊन दुर्मतीच्या डोक्यात घातला व त्यास ठार

मारले. याप्रमाणे दैत्याचा पराभव झाला ते पाताळात निघून गेले. मग देवांनी मोठा उत्सव केला व ज्या क्षेत्रात शंकरभवानीला सिद्धि मिळाली त्याचे 'सिद्धाश्रम' असे नाव ठेविले व वैशाख पौर्णिमेस सर्व देव तेथे मोठा उत्सव करूं लागले-

## अगस्त्यऋषि–राधांमदनिवारण–अगस्त्यकृत समुद्रपान–कपिलावतार–चिंतामणिहरण–गणासुर–प्रल्हादशापनिवारण

सूत :- मुनीहो! अगस्त्य ऋषींनें वेदमंत्र म्हणून इल्वल राक्षसाचा नाश केला, ती कथा व वातापीचा नाश करण्यासाठी व श्राद्धास बोलावून देवब्राह्मणास आपल्या बंधूचे मांस खावयास घालणारा व नंतर मंत्रसामर्थ्यानें इल्वलास म्हणजे आपल्या भावास ब्राह्मणांची पोटें फोडून बाहेर येण्याचें सामर्थ्य देणाऱ्या वातापीचा आश्रय जो समुद्र, त्याचें शासन करण्यासाठी विघ्नहर्त्या गणपतींची आराधना केली ती कथा, तसेच, गोलोकांत राधाकृष्ण हे दांपत्य प्रेमसुखाचा अखंड अनुभव घेत असता उभयतांस गर्व झाला, राधेने कृष्णास 'तूं मनुष्यलोकी जन्म पावशील' असा, व कृष्णाने राधेस तसाच शाप दिला ती कथा, पुढे उभयता ध्यानावर येऊन त्यांनीं गणपतींचें आराधन केलें व मनुष्यलोकी गोकुळांत जन्म घेऊन अनेक प्रकारच्या क्रीडा केल्या, शेवटी उभयतांस शंभर वर्षे विरहदुःख भोगावे लागले व त्यांत त्यांनी गणेशभक्ति केली ह्मणून ते दंपत्य पुनः एकरूप झाले ती, ह्या सर्व कथा झाल्यावर ब्रह्मदेवाने अगस्त्याला गणेशस्वरूप सांगितले व 'वद्य चतुर्थीला उपास कर व गणेशपूजा कर' असें सांगून गणेशदीक्षा दिली व त्याने गणेशभक्ति करून समुद्रपानाचे ह्मणजे तो सगळाच्या

सगळा पिऊन वातापीला मारण्याचे सामर्थ्य मिळविले, ही कथा सांगून म्हणाले:— कर्दमदेवहूतीच्या उदरी विष्णूने 'कपिल' नावाने अवतार घेऊन सर्वत्र ज्ञानाचा उपदेश केला व गणेशमंत्राची दीक्षा देऊन माता पितरांस शांतियोगाची प्रक्रिया सांगितली व त्यांस गणेशमार्गास लाविले. पुढें, इंद्राने या कपिलमहामुनींला गणेशप्रिय जो 'चिंतामणि' नांवाचा मणि तो दिला व तो विघ्नविनाशक आहे असे समजून कपिलाने गळ्यात बांधला. पुढे एकदा गणासुर नांवाचा दैत्य विश्रांतीकरता म्हणून त्या आश्रमात आला. कपिलाने त्याचा सत्कार करून गणासुराला भोजनाचे आमंत्रण दिले व 'आपल्या सैन्यासह या असे सांगितले. नंतर कपिलाने चिंतामणीची पूजा करून प्रार्थना केली; तेव्हां षड्रस अन्न सर्वांस पुरुन उरेसे सिद्ध झाले. सर्वांची भोजने यथासांग झाली. हे पाहून गणासुराला आश्चर्य वाटले; ह्मणून त्याला कपिलाने चिंतामणीची गोष्ट सांगितली. ती ऐकून गणासुराला मण्याचा लोभ उत्पन्न झाला, व ऋषि देत नाही, असे पाहून तो राक्षस जबरीने तो मणि नेता झाला! 'असंगाशी संग व प्राणाशी गाठ' ह्मणतात ते खोटे नाही. असो; हा गणासुर अभिजित् नामक राजाचा मुलगा होता. हा ब्रह्मदेवाचा अंश होता. याने शुक्राच्या उपदेशानुसार शंकराची उग्र तपश्चर्या केली व त्रैलोक्याचे राज्य मिळेल व त्रिगुणी वस्तु तुला मारणार नाही' असा वर मिळवून त्रिलोकावर आपला अंमल बसविला. नंतर त्याने कपिलापासून मणि हिरावून नेला. इकडे भक्तोत्तम कपिलाने गणेशाराधन केले, त्यास प्रसन्न करून घेतले आणि अखंड भक्ति, स्मरणानंतर दर्शन व मणिप्राप्ति हे वर मागितले व मिळविले. एक दिवस अग्निहोत्रविधी संपवून कपिल गणेशध्यान करीत असता तेथे गजान-

नाची मूर्ति अवतीर्ण झाली; तेव्हा अनेक चिंतामणि कपिलाने पाहिले. ते पाहून त्यास उपरति झाली कां, देवाचे भूषणाची पूजा न करता आपण ते गळ्यात बांधले! ही चुकी केली ह्मणूनच ते देवभूषण नष्ट झाले. गंधपुष्पादि देवाचा निर्माल्य आपण घ्यावा, पण देवाचे अलंकारांचा आपण मानवांनी उपभोग घेऊ नये, हा नियम आहे. गणपतींनी सांगितले, 'आता दुःख करण्याचे कारण नाही. तुझा मणि तुला परत देतो.' इकडे गणासुराला स्वप्न पडले की, कपिलापासून हरण केलेल्या मण्याबद्दल आपले डोके फुटले! गणासुर रागावला व कपिलास शिक्षा करण्यासाठी त्याच्या आश्रमांत आला. त्याच्या सैन्याचे व देवीपुत्र 'लक्ष' यांचे युद्ध झाले. शेवटी, गणपतीनी गणासुराचा शिरच्छेद केला व तो मणि कपिलास आणून दिला. कपिलाने तो मणि विनायकाच्या गळ्यात बांधून ह्मटले की 'हा चिंतामणि आपला आहे. आजपासून आपलेही नांव चिंतामणि होवो! मला अखंड भक्तिसुख मिळो! आपल्यास सहस्रशः नमन करतो.' त्याने देवास अनेक साष्टांग नमस्कार घातले. त्यांचा स्वीकार करून व कपिलावर अनुग्रह करून चिंतामणि अंतर्धान पावले.

**सूत :–** याप्रमाणे अवतारकथा सांगून गृत्समदानें प्रल्हादास सांगितले की 'शक्ति, सूर्य, विष्णु व शंकर' हे गणेशाचे चार गौणावतार आहेत; मात्र तू भक्तिज्ञानपूर्वक गणपतीचे आराधन कर ह्मणजे दुष्ट सगतीमुळे जी बाधा तुला झाली आहे, तीचा नाश होईल व तुला शांति मिळेल.' प्रल्हादाने याप्रमाणे केले व तो शांतिसुख पावला. नंतर मुद्गलाने गणेशक्षेत्राचे माहात्म्य सांगितले. व तो विश्रांती घेण्यास गेला.

—०—